आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष-२२१० जी २८९)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२**१/ प्र.क्र. ५ / कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ डिसेंबर,२०२१.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०५/कार्या-०६, दि.२८.०७.२०२१, दि.३०.०९.२०२१, दि.११.१०.२०२१ व दि.३.१२.२०२१.
३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. मफुयो-२०२१/प्र.क्र.११६/आरोग्य-६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेअंतर्गत दि.०१.०२.२०२१ ते दि.३१.०३.२०२१ या कालावधीतील प्राप्त झालेल्या वैद्यकीय दाव्यांच्या प्रतिपूर्तीसाठी रु.६४.२१८३७ लाख व दि.०१.०४.२०२१ ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीतील प्राप्त झालेल्या वैद्यकीय दाव्यांच्या प्रतिपूर्तीसाठी रु.९०.२५५७१ लाख असा **एकूण रु.१५४.४७४०८ लाख** इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्राप्त प्रस्तावास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत दि.०१.०२.२०२१ ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीतील अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांच्या वैद्यकीय दाव्यांची प्रतिपूर्ती करण्यासाठी **एकूण रु.१५४.४७४०८ लाख** निधी वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशीर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | आतापर्यंत वितरीत तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना | २२१० जी २८९ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ८०००.०० | ५११७.९८५१९ | १५४.४७४०८ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१५४.४७४०८ लाख (अक्षरी रुपये एक कोटी चोपन्न लाख सत्तेचाळीस हजार चारशे आठ फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९८१/व्यय-१४, दि.१०.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२४१५४००२२७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2021.12.14 15:35:26 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग